राज्य उत्पादन शुल्क विभागातील सह आयुक्त, गट-अ संवर्गातून अपर आयुक्त, गट-अ या संवर्गात पदोन्नती व पदस्थापना देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन आदेश क्रमांकः- इएसटी-२७२३/प्र.क्र.३५/राउशु-१**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांकः- १७ मे, २०२३.

**शासन आदेशः-**

राज्य उत्पादन शुल्क विभागातील सह आयुक्त (गट-अ) (वेतनश्रेणी एस-२५ ७८८००-२०९२००) या संवर्गातून अपर आयुक्त (गट-अ) (वेतनश्रेणी एस-२७ : ११८५००-२१४१००) या संवर्गात पदोन्नती देण्यासाठी तयार करण्यात आलेल्या सन २०२२-२३ च्या निवडसूचीमधील खालील अधिकाऱ्यास अपर आयुक्त (गट-अ) या संवर्गात पदोन्नती देण्यात येत असून, पदोन्नतीनंतर, त्यांची, त्यांच्या नावासमोर (स्तंभ ४ येथे) दर्शविण्यात आलेल्या ठिकाणी, पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव | प्रवर्ग | पदोन्नतीनंतर देण्यात येणारी पदस्थापना |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | श्री. यतिन पंढरीनाथ सावंत | खुला | अपर आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई. |

२. सदर पदोन्नती ही खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

१) सदर पदोन्नती, निवडसूची तयार करताना कोणीही ज्येष्ठ अधिकारी अनावधानाने वगळण्यात आलेले नाहीत अथवा अधिक्रमित झालेले नाहीत, याच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

२) सदर पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात, मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या अधीन राहून पदोन्नतीच्या कोटयातील सर्व रिक्त पदे दि.२५.०५.२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार, निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात सा.प्र.वि./१६-ब यांच्या दि.०७.०५.२०२१ च्या शासन निर्णयानुसार दिलेल्या सुचनांनुसार देण्यात येत आहे.

३) रिट पिटीशन स्टँप नं.१०८७६/२०२१ व रिट पिटीशन स्टँप नं.१०८७८/२०२१ मध्ये मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी दि.२५.०५.२०२१ रोजी दिलेल्या निर्णयानुसार सदर पदोन्नती नमूद रिट याचिकेत होणाऱ्या निर्णयाच्या अधीन राहील.

४) सदर पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरुपाची असल्याने या तात्पुरत्या स्वरूपातील पदोन्नतीमुळे संबंधित अधिकाऱ्यास नियमितपणाचे कोणतेही हक्क प्राप्त होणार नाहीत.

३. हे आदेश तात्काळ अंमलात येतील. सदर अधिकाऱ्यांनी त्यांना देण्यात आलेल्या पदोन्नतीच्या पदस्थापनेच्या ठिकाणी तात्काळ हजर होऊन पदाचा कार्यभार घ्यावा.

सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२३०५१७१५२९५४९७२९ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANDEEP GORAKHNATH DHAKANE

Digitally signed by SANDEEP GORAKHNATH DHAKANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=418588839686584ca25060bf57af23a4473234ebcc421d084d8890fc37c8f673, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=E7B44D71EACB46FA051532FB66A73DA715F678033161C1162FA83F6713D03552, cn=SANDEEP GORAKHNATH DHAKANE
Date: 2023.05.17 16:21:03 +05'30'

**( संदिप ढाकणे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
२) मा.मंत्री, राज्य उत्पादन शुल्क यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
३) अपर मुख्य सचिव, राज्य उत्पादन शुल्क यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
४) आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५) महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई व नागपूर,
६) श्री.य.पं.सावंत, अपर आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, म.रा., मुंबई,
७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
८) सर्व विभागीय उपआयुक्त, राज्य उत्पादन शुल्क,
९) सर्व अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क,
१०) कार्यासन अधिकारी, राउशु-२ व ३, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) निवडनस्ती.